## पाहुणं पिल्लू


४८१, पर्वती, आपली सोसायटी
स्वानंद बिल्डिंग क्र. ३, ब्लॉक क्र. २३,
शिवदर्शन चौक, शाहू कॉलेज रस्ता,
पुणे - ४११ ००९
दूरध्वनी क्रमांक : २४४४००६४

❒ **प्रकाशक :**
कजा कजा मरू प्रकाशन
गरवारे बालभवन,
सारसबागेसमोर, पुणे - ४११ ००२.
दूरध्वनी क्रमांक : २४४४२१०९

❒ प्रथमावृत्ती : १४ नोव्हेंबर २००९

❒ **आतील रेखाचित्रे :**
मैत्रेयी सुगवेकर

❒ **मुद्रक :**
माधव नागपूरकर
श्री मुद्रण मंदिर
९१४ सदाशिव पेठ, पुणे - ४११ ०३०.

❒ किंमत : २०/-



# पाहुणं पिल्लू

**मैत्रेयी सुगवेकर**

**कजा कजा मरु प्रकाशन - गरवारे बालभवन**

माझ्या घराची गॅलरी माझी सर्वांत आवडती जागा आहे. मी तिथे घर-घर खेळते. टिचर-टिचर खेळते. तिथेच माझी भातुकली आहे. चूल आहे. मी तिथे स्वयंपाक करते. तिथून झाडं, पक्षी, समोरची घरं, तिथे खेळणारी इतर मुलं दिसतात. त्या पलीकडचा रस्ता पण दिसतो. शेजारच्या सोसायटीतील मोठ्ठी झाडं पण दिसतात. मोठ्या घरात मुलांचं घर होत नाही पण छोट्या गॅलरीत मुलांचं सगळं होतं म्हणून मला गॅलरी खूप आवडते. तिथे खूप मज्जा येते.

समोरच्या सोसायटीतलं माझ्या गॅलरीतून दिसणारं मोठ्ठच्या मोठ्ठ मोहागिनीचं झाड. एकदा सगळं तोडून टाकलं. सकाळी एकदा खूप माणसं आली. त्यांनी फांद्यांना मोठ्ठ्या जाड दोऱ्या बांधल्या. काही माणसं वर झाडावर चढली. त्यांनी कुऱ्हाडीनी सगळं झाड तोडलं. खूप पानं, फांद्या माझ्या गॅलरीत पडल्या. आईनी गॅलरीतलं माझं सगळं घर आवरून ठेवलं. आई म्हणाली झाड वाढायला किती वर्ष लागतात. तोडलं मात्र किती पटकन. मी शाळेतून आल्यावर गॅलरीतून बघितलं सगळं एकदम वेगळंच दिसत होतं.

त्यामुळे झाडावरची कबुतरांची घरटी पडली, कबुतरं कुठेच दिसत नव्हती. रोजच्यासारखा त्यांचा आवाज येत नव्हता. पक्षांच्या जगात जणू भूकंपच झाला. जमिनीवर सगळीकडे पानं. मोठी, लहान लाकडं पडली होती. आईनी सांगितलं बाकीचं झाड तोडताना आमच्या गॅलरीतल्या कुंड्यापण हालवायला सांगितल्या होत्या.



त्यानंतर रात्री मी झोपले होते तेव्हा गॅलरीतून टकटक असा आवाज यायला लागला. सकाळी उठून बघितलं तर एक कबुतराचं पिल्लू एका कुंडीत येऊन पडलं होतं. शाळेत जाईपर्यंत माझं सगळं लक्ष त्याच्याकडेच होतं. गॅलरीचं दार थोडंसं जरी उघडलं तरी ते घाबरून खूप पंख हलवायचं आणि घाबरून माझ्याकडे बघायचं. नंतर लक्षात आलं त्याच्या पायाला काहीतरी झालं आहे. त्याच्या एका पायाच्या तीन नखांपैकी एका वर कसलातरी गोळा आलाय आणि त्यानी तो पाय हलवला की तो टकटक आवाज येतोय.

खूप दिवसापूर्वी पण असच एक कबुतराचं पिल्लू आमच्या गॅलरीत येऊन पडलं होतं. मग आईनी (कात्रज सर्पोद्यानात) राजीव गांधी उद्यानाच्या अनाथालयात फोन केला. ते काका येऊन त्याला घेऊन गेले. त्याची आई सारखी आमच्या गॅलरीत येऊन बसत होती. काकांना मी सांगितलं ते मोठ्ठं झालं की त्याला परत इथेच आणून सोडा कारण त्याची आई त्याची इथे त्याची वाट बघते आहे. नव्या पिल्लामुळे मला परत त्या पिल्लाची खूप आठवण आली. ते आणि त्याची आई परत भेटले असतील का ? असं वाटलं कारण आता मला सगळी कबुतरं सारखीच दिसत होती. त्यावेळी त्या पिल्लाला काहीतरी खूण करून ठेवायला हवी होती. म्हणजे आता बरं झाल्यावर मला ते ओळखता आलं असतं.

रोज सकाळी उठल्या उठल्या गॅलरीचं दार हळूच उघडून मी त्याला पहायची ते रोज थोडं थोडं मोठं वाटायचं. त्याची आई त्याला खायला द्यायला यायची. कठड्यावर बसून त्याच्याकडे लक्ष ठेवायची, त्याच्याशी खेळायची, त्याला गोष्ट सांगायची. मग गॅलरीचं दार अगदी हळू उघडायला लागायचं कारण पिल्लू आता इकडे तिकडे करायला लागलं होतं आणि त्याची आई सारखी कठड्यावर बसलेली असायची. शाळेत जाताना मी त्याला अच्छा करून जायची आणि आल्या आल्या बघायची ते नीट आहे ना ?

एके दिवशी गॅलरीचं दार बंद होतं आणि मी आत खेळत होते. पिल्लाच्या पंखाचा फडफड आवाज यायला लागला. खिडकीचे दार उघडून बिघतलं तर तिथे एक कावळा कबुतराला त्रास द्यायला आला होता. त्यामुळे पिल्लू घाबरून गेलं होतं मी त्या कावळयाला शूकशूक करून उडवलं नंतर काय झालं मी पिल्लाकडे बघितलं. ते त्याच्या शब्दांत मला Thank You म्हणत होतं. पिल्लाच्या पायाच्या आवाजावरून आता आम्हाला बंद घरातून सुद्धा ते काय करत असेल ते कळायला लागलं.

काही दिवसांनी एकदा आईनी मला गॅलरीत बोलवलं तर पिल्लू कठड्यावरच्या कुंडीत येऊन बसलं होतं आणि त्याची आई त्याला उडायला लावत होती. मग पिल्लू आमच्या बाथरुमच्या खिडकीत जाऊन बसलं. त्याच्या आईनी त्याला पंखांनी आणि चोचीने हलवून उडायला लावलं आणि जवळ जवळ हवेत ढकलून दिलं.

मग ते समोरच्या गच्चीवर जाऊन बसलं तर त्याच्या मागे कावळा लागला. मग पिल्लाचे काका, मामा, मावशी अशी खूप कबुतरं आली आणि त्याच्या आजूबाजूला बसली. मग कावळयानी पण खूप कावळयांना बोलावलं. मी कावळयांना हकलायला लागले तर कबूतर पण घाबरली. मग मी काहीच केलं नाही. थोड्यावेळानी पिल्लू गच्चीवर आलेल्या एका झाडाच्या फांदीवर गेलं मग कावळे गेले. आता त्याच्याजवळ फक्त त्याची आई होती. गच्चीवर ते खूप वेळ इकडे-तिकडे करत होतं.

सगळं झाल्यावर ते खूप वेळ गच्चीच्या कठड्यावर बसून होतं. मला म्हणालं, ''बाय आता मी जातो माझ्या घरी. मला मदत केलीस म्हणून मी तुला काहीतरी बक्षीस देतो.'' आणि गॅलरीत बघितलं तर त्याच्या अंगावरची ताजी पिसं ते ठेऊन गेलं होतं.

त्यानंतर रोज गॅलरीतून झाडाच्या नुसत्या बुंध्यांकडे बघून मला खूप वाईट वाटायचं, कारण कुठलेच पक्षी नव्हते. मग वाटलं की आता हे झाड कधीच येणार नाही. पण नंतर अचानक एके दिवशी बुंध्यावर दोन पानं आलेली दिसली आणि त्यावर एक कबूतर पण बसलं होतं. तेव्हापासून मी पण गॅलरीत परत माझं घर मांडलं.

शहरात अनेक कारणांनी मोठी झाडं तोडली जातात. कधी रस्ता रुंद करायचा म्हणून. कधी रहायला इमारती बांधायच्या म्हणून. असं एक झाड तोडलं जातं तेव्हा त्यावर राहणाऱ्या पक्ष्यांचं काय होतं ? आणि ते सगळं पाहणाऱ्या, पक्ष्यांवर प्रेम करणाऱ्या मुलीला त्याचं किती वाईट वाटतं हे या गोष्टीत वाचायला मिळतं. तिला असं वाटतं की ते पिल्लू म्हणजे आपण आहोत आणि त्याची आई आपल्या आईसारखी आहे.



मैत्रेयी सुगवेकर या पुस्तकाची लेखिका आहे. मैत्रेयी सध्या अकरा वर्षांची आहे. ती एस.पी.एम. इंग्लिश स्कूलमधे सहावीत शिकते आहे. तिला तिची शाळा खूप आवडते.

चौथीतच तिनं हे पुस्तक लिहिलं. गाणी म्हणायला तिला खूप आवडतं. नाच करायला पण आवडतं. नवीन नवीन गोष्टी करण्यात तिला रस असतो. बालभवनमधे यायला तिला सगळयात जास्त आवडतं. ती नाटकात कामं करते. भाषणही छान करते.